**राज्यातील सर्व कारखान्यांची/आस्थापनांची अचानक तपासणी करण्यासाठी तपासणी पथकाची (Vigilance Squad)स्थापना करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय**

क्रमांक:-संकिर्ण-बैठक-१२/०९/प्र.क्र.३५१/कामगार-९
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ११ फेब्रुवारी, २०१०.

वाचा:- १) शासन पत्र समक्रमांक दिनांक १ फेब्रुवारी, २०१०.
२) शासननिर्णय समक्रमांक दिनांक २ फेब्रुवारी, २०१०.
३) शासननिर्णय समक्रमांक दिनांक ४ फेब्रुवारी, २०१०.

**प्रस्तावना:-**

जागतिकीकरणाच्या पार्श्वभूमीवर तसेच वाढत्या स्पर्धात्मक काळात कामगारांवर पडणारा कामाचा ताण, कारखान्यांमध्ये /आस्थापनांमध्ये मुक्तपणे होत असलेला कंत्राटी पध्दतीचा वापर तसेच अनेक कामगार कायद्यांची अंमलबजावणी प्रभावीरित्या न होणे, कारखान्यांत/आस्थापनांत सुरक्षितता न पाळली जाणे इत्यादी त्रुटी समोर आल्या आहेत. या त्रुटी दूर करुन कामगार कायद्याची प्रभावीपणे अंमलबजावंणी करण्यासाठी दि. ३१.१२.२००९ रोजी मा. मंत्री (कामगार) यांच्या अध्यक्षतेखाली कामगार विभागाच्या आढावा बैठकीत मा. मंत्री (कामगार) यांनी दिलेल्या आदेशानुसार राज्यातील सर्व कारखान्यांची / आस्थापनांची अचानक तपासणी करण्यासाठी अधिकाऱ्यांचे एक तपासणी पथक (Vigilance Squad) स्थापन करणेबाबत निर्णय घेण्यात आलेला शासन निर्णय दिनांक ४. फेब्रुवारी, २०१० च्या शासन निर्णयाद्वारे संस्थगित करण्यात आला होता. सदर शासन निर्णय पुनर्स्थापित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

सदर तपासणी पथकामध्ये खालील अधिकाऱ्यांचा समावेश असेल:-

**पथकातील अधिकारी:-**

१) श्री. र. वि. कुलकर्णी, उप कामगार आयुक्त, कामगार आयुक्त कार्यालय, मुंबई
२) श्री. दिलीप बी. पवार, सहायक कामगार आयुक्त, जी वॉर्ड, मुंबई
३) श्री. शशिकांत वैराट, सहायक कामगार आयुक्त (औद्योगिक संबंध), मुंबई
४) श्री. सतिश ए. टिक्के, उप संचालक (औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय), मुंबई
५) श्री. सुहास रणदिवे, उप संचालक, मुंबई
६) श्री.बी.बी. इंगळे, उप संचालक (बाष्पके), मुंबई

## पथकाची कार्यपध्दती

सदरहू पथक अचानक कोणत्याही कारखान्यास /आस्थापनेस भेट देईल व त्या कारखान्यातील/ आस्थापनातील कामगारांच्या कामाचे स्वरुप, विविध कामगार कायद्यांच्या अंमलबजावणीविषयक वस्तुस्थिती, कामगारांच्या सुरक्षिततेविषयक बाबींची तपासणी, कामगांराचे आरोग्यविषयक बाबी इत्यादी विषयांची तपासणी करुन त्याबाबतचा अहवाल हे पथक तीन महिन्यात शासनास सादर करील.

२. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून पुढील आदेशापर्यंत अंमलात राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(चं. रा. गोसावी)
**शासनाचे उपसचिव**

प्रति,

मा. मंत्री (कामगार) यांचे स्वीय सहायक,
मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे स्वीय सहायक,
सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक,
कामगार आयुक्त, कॉमर्स सेंटर, ताडदेव, मुंबई ४०० ०३४.
संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कॉमर्स सेंटर, ताडदेव, मुंबई - ०००३४.
संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई.
प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, वांद्रे (पूर्व) मुंबई - ४०० ०५१.
संचालक, महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई - ४०० ०१२.
आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ,. एलफिन्स्टन, मुंबई - ४०० ०१३.
पथकातील सर्व अधिकारी (द्वारा कामगार आयुक्त कार्यालय, मुंबई
कामगार विभागातील सर्व उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी
निवडनस्ती (कामगार-९)